विश्व विला को.ऑ.हौ.सो. मालमत्ता क्र.डी-२८९४(१), स्ट्रीट क्र.१९६, डी वॉर्ड, लेबरनम रोड, मुंबई ४०० ००७ या मालमत्तेस दुरुस्ती उपकरातून सूट देण्याबाबत......

**महाराष्ट्र शासन**

**गृहनिर्माण विभाग**

**शासन निर्णय क्र.ईएक्सएम-२०००/प्र.क्र.४४३/दुवपू.१**

मंत्रालय ,मुंबई ४०० ०३२.

दि. ११ मे, २०१५

वाचा : शासनाचा समक्रमांकाचा दि.१७.१०.२००७ चा शासन निर्णय

**प्रस्तावना,**

म्हाड अधिनियम, १९७६ च्या कलम ८३(१)(एम) मधील तरतुदीनूसार व उच्च न्यायलयाने रिट याचिका क्र.४०२७/१९८७ पर्ल मेन्शन को-ऑप हौ.सो. विरुध्द बृहन्मुंबई महानगरपालिका व रिट याचिका क्र.१६२४/ १९९९ प्रागजी वृदांवन को-ऑप हौ.सो. विरुध्द महाराष्ट्र शासन या दाव्यांमध्ये दुरुस्ती उपकरातून सुट मिळणेबाबत केलेल्या अर्जाच्या दिनांकापासून दुरुस्ती उपकरातून सूट देण्याबाबत दिलेले निर्णय विचारात घेवून याच धर्तीवर गृहनिर्माण विभागाच्या समक्रमांकाच्या दि.१७.१०.२००७ च्या शासन निर्णयाव्दारे विश्व विला को.ऑ.हौ.सो. मालमत्ता क्र.डी-२८९४(१), स्ट्रीट क्र.१९६, डी वॉर्ड, लेबरनम रोड, मुंबई ४०० ००७ या मालमत्तेस उपकरातून सुट मिळणेबाबत विश्वस्त, चिमणलाल अमृतलाल न्यास यांनी केलेल्या विनंती अर्जाच्या दिनांकापासून म्हणजे दि.६.३.२००० पासून उपकरातून सुट देणेबाबतचा दि.१७.१०.२००७ चा शासन निर्णय शासन मान्यतेने निर्गमित करण्यात आहे.

विश्व विला को.ऑ.हौ.सो. यांनी बृहन्मुंबई महानगरपालिका व इतर यांचे विरोधात दाखल केलेल्या रिट याचिका क्र.३८६/२०१२ मध्ये मा.उच्च न्यायालयाने दि.२६.११.२०१३ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयाव्दारे या विभागाचा विश्व विला को.ऑ.हौ.सो.स दि.६.३.२००० पासून उपकरातून सुट देणेबाबतचा दि.१७.१०.२००७ चा शासन निर्णय त्यात अंतर्भुत अंमलबजावणीच्या तारखेसंदर्भात रद्द केला आहे. न्यायालयाच्या निर्णयामध्ये सदर प्रकरणी म्हाड अधिनियम, १९७६ च्या कलम ८३(१)(एम) नूसार म्हणजेच मालमत्ता मोकळा भुखंड म्हणून प्रमाणित झाल्याच्या दिनांकापासून दुरुस्ती उपकरातून सुट देण्याची तरतुद लागु होत असल्याचे नमूद करण्यात आले आहे.

**शासन निर्णय :**

विश्व विला को.ऑ.हौ.सो. यांनी बृहन्मुंबई महानगरपालिका व इतर यांचे विरोधात दाखल केलेल्या रिट याचिका क्र.३८६/२०१२ मध्ये मा.उच्च न्यायालयाने दि.२६.११.२०१३ रोजी दिलेल्या निर्णय व म्हाड अधिनियम, १९७६ च्या कलम ८३(१)(एम) ची तरतुद पाहता मालमत्ता क्र.डी-२८९४(१), स्ट्रीट क्र.१९६, डी वॉर्ड, लेबरनम रोड, मुंबई ४०० ००७ या मालमत्तेस दुरुस्ती उपकरातून सुट मिळणेबाबत केलेल्या विनंती अर्जाच्या दिनांकापासून म्हणजे दि.६.३.२००० पासून उपकरातून सुट देणेबाबतचा दि.१७.१०.२००७ च्या

शासन निर्णयामध्ये सुधारणा करण्यात येत असून, या निर्णयाव्दारे विश्व विला को.ऑ.हौ.सो. मालमत्ता क्र.डी-२८९४(१), स्ट्रीट क्र.१९६, डी वॉर्ड, लेबरनम रोड, मुंबई ४०० ००७ या मालमत्तेस मोकळा भुखंड म्हणून प्रमाणित झाल्याच्या दिनांकापासून म्हणजे दि.१.१०.१९९६ पासून दुरस्ती उपकरातून सुट देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov,in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१५०५१११४५८४३८९०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावाने,

Prashant P Badgeri

Digitally signed by Prashant P Badgeri
DN: CN = Prashant P Badgeri, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.05.11 14:59:53 +05'30'

**( प्र.पु.बडगेरी )**
शासनाचे अवर सचिव

**प्रत,**

१. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, वाद्रे(पु.), मुंबई ५१.
२. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, महानगरपालिका भवन, फोर्ट, मुंबई ०१.
३. मुख्य अधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, गृहनिर्माण भवन, वाद्रे(पु.), मुंबई ५१.
४. सहायक कर निर्धारणा व संकलक, अे विकाग कार्यालय, १३४-ई, शहीद भगतसिंग मार्ग, फोर्ट, मुंबई ०१.
५. मुख्य लेखा अधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, गृहनिर्माण भवन, वाद्रे(पु.), मुंबई ५१.
६. विश्वस्त, चिमणलाल अमृतलाल न्यास, १६, लेबरनम रोड, गावदेवी, मुंबई ०७.
७. विश्व विला को.ऑ.हौ.सो., १६, लेबरनम रोड, गावदेवी, मुंबई ०७.
८. निवड नस्ती, कार्यासन दुवपू-१.